३. व्यापारी बँकांची तसेच ग्रामीण बँकांची विभागीय / प्रशासकीय कार्यालये, प्रत्येक जिल्हयातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका (नोडल बँका) यांनी योजनेच्या अनुषंगाने त्यांना प्राप्त झालेल्या सर्व मार्गदर्शक सुचना, शासन निर्णय इ. त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व शाखांना पाठविणे आवश्यक आहे.
४. व्यापारी बँकांची तसेच ग्रामीण बँकांची विभागीय / प्रशासकीय कार्यालये, प्रत्येक जिल्हयातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका (नोडल बँका) यांनी कर्जदार शेतकऱ्यासाठी कर्ज मंजूर करताना त्यांच्या विमा हप्ता रकमेसाठी जादा कर्ज मंजूर करणेबाबत आपल्या अधिनस्त सर्व बँकांना सुचना द्याव्यात.
५. योजनेत सहभागी होऊ इच्छिणाऱ्या बिगर कर्जदार शेतकऱ्यांना सर्व बँकांनी योग्य ते मार्गदर्शन व मदत करणे आवश्यक आहे. जसे, शेतकऱ्यांचे बँकेत खाते उघडणे, योग्य तो विमा हप्ता घेवून त्यांना विमा प्रस्ताव भरण्यास मदत करणे व त्याबाबतचे अहवाल अद्ययावत करणे इ.
६. सर्व बँका / वित्तिय संस्थांनी अर्जदार शेतक-यांचा तपशिल इलेक्ट्रॉनिक पध्दतीनेच राष्ट्रीय पीक विमा पोर्टलवर अपलोड करणे बंधनकारक आहे. त्यादृष्टीने सर्व बँका / वित्तिय संस्थांनी सीबीएस इंटेग्रेशन करुन घेणे गरजेचे आहे, जेणेकरुन माहितीचे तात्काळ आदान-प्रदान शक्य होईल.
७. सर्व नोडल बँकांनी कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्यांचा जमा विमा हप्ता रक्कम, विमा प्रस्ताव व अनुषंगिक माहीती विहीत मुदतीत स्वतंत्रपणे संबंधित विमा कंपनीस सादर करणे आवश्यक आहे.
८. सर्व अग्रणी बँका / नोडल बँकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील अधिसुचित पिकांसाठी घेतलेली सर्व कर्जे व कर्जदार शेतकरी योजनेअंतर्गत विमा संरक्षित केले जातील व एकही कर्जदार शेतकरी विमा संरक्षणापासून वंचित राहणार नाही याची दक्षता घ्यावी व त्याबाबतच्या सुचना बँकांनी आपल्या अधिनस्त सर्व शाखांना देण्यात याव्यात. संबंधित बँकाच्या त्रुटीमुळे / दिरंगाईमुळे / हलगर्जीपणामुळे काही कर्जदार शेतकऱ्यांना विमा संरक्षण न मिळाल्यास व त्या हंगामात नुकसान भरपाई मंजूर झाल्यास विमा संरक्षित न झालेल्या सर्व शेतकऱ्यांना मंजूर नुकसान भरपाई देण्याची जबाबदारी सर्वस्वी त्या बँकेची / शाखेची राहील.
९. घोषणापत्र / प्रस्ताव आणि विमा हप्ता विमा कंपनीला बँकेमार्फत/ प्राथमिक कृषी पत पुरवठा संस्था यांच्याकडून विहित मुदतीनंतर जमा झाला तर ते तात्काळ नाकारले जातील व अशा कोणत्याही घोषणापत्राबाबत संबंधीत बँक जबाबदार राहील. त्यानुसार विहित मुदतीनंतर राष्ट्रीय पीक विमा पोर्टलवर अर्ज दाखल करण्याची सुविधा बंद केली जाईल. तथापि या संबंधी काही तक्रारी उदभवल्यास त्यांचे निराकरण विहित तक्रार निवारण समितीच्या कार्यपद्धतीनुसार करण्यात येईल. अधिसूचित पिकांसाठी हंगामी पीककर्ज घेणा-या कर्जदार शेतक-यांना प्राथमिक कृषि सहकारी संस्थांसह कोणत्याही वित्तीय संस्थेने विमा योजनेतून सूट देण्याचा निर्णय घेतलेला असेल तरीदेखील अशा कोणत्याही निर्णयावर हे कलम प्रचलित राहील व अशा शेतक-यांचा पीक विमा योजनेतील सहभाग बंधनकारक राहील. तथापि किसान क्रेडीट कार्ड अथवा तत्सम शेती कर्जे, जी विशिष्ट पिकाच्या पिक कर्ज मर्यादेनुसार नसतात त्या शेतक-यांचा विमा योजनेतील सहभाग बंधनकार नाही. मात्र बँका अशा शेतक-यांना बिगर कर्जदार शेतकरी म्हणून विमा योजनेत सहभागी होण्यास प्रोत्साहित करु शकतात.
१०. सर्व नोडल बँका / व्यापारी बँका व ग्रामीण बँकांच्या सर्व शाखांनी पिकवार व अधिसुचित क्षेत्रवार पिक विमा प्रस्ताव विहीत विवरण पत्रात (बिगर कर्जदार शेतकऱ्यांसाठी वेगळे) भरून विमा हप्ता रकमेसह विहीत वेळेत संबंधित विमा कंपनीकडे पाठविणे अत्यंत आवश्यक आहे.
११. सर्व नोडल बँका / व्यापारी बँका / ग्रामीण बँकांनी शेतकरीनिहाय पिक विमा प्रस्ताव व विमा हप्ता जमा केल्याचा तपशिल (NEFT/RTGS/UTR) राष्ट्रीय पिक विमा पोर्टलवर ऑनलाईन अपलोड करणे आवश्यक आहे. तसेच सर्व प्रस्तावांचा गोषवारा विहित वेळेत विमा कंपनीलाही पाठवणे आवश्यक आहे.
१२. सर्व बँकांनी योजनेअंतर्गत अपवादात्मक परिस्थितीमध्ये संबंधित विमा कंपनीमार्फत मंजूर झालेली नुकसान भरपाई रक्कम प्राप्त झाल्यानंतर संबंधित लाभार्थी शेतकऱ्यांच्या बँक खात्यावर ७ दिवसांच्या आत जमा करणे आवश्यक आहे. जर एखाद्या बँकेने नुकसान भरपाईची रक्कम विहीत वेळेत शेतकऱ्यांच्या बँक खात्यावर जमा केली नाही तर संबंधित बँकेने व्याजासह (बचत खात्यावर देय असलेला प्रचलित व्याज दर) नुकसान भरपाईची रक्कम शेतकऱ्यांच्या खात्यावर जमा करणे बंधनकारक राहील.
१३. नोडल बँक / प्रशासकीय कार्यालये योजनेत भाग घेणाऱ्या शेतकऱ्यांची अनुषंगिक माहीती शेतकऱ्याचे संपूर्ण नाव, अचुक बँक खाते क्रमांक, गावाचे नाव, अल्प - अत्यल्प भुधारक अशी वर्गवारी, अनुसूचित जाती

जमाती, महीला शेतकरी अशी वर्गवारी, विमा संरक्षित क्षेत्र, पिकाचे नाव, जमा विमा हप्ता, शासकिय अनुदान इ. माहीती संबंधित प्राथमिक कृषि पत पुरवठा सहकारी संस्था / बँकेची शाखा यांचेकडून Soft Copy मध्ये घेऊन सदरची माहीती तपासून अंतिम मुदत संपल्यानंतर १५ दिवसांच्या आत संबंधित विमा कंपनीकडे पाठविण्याची कार्यवाही करेल.

१४. संबंधित विमा कंपनी बँकेकडून विमा प्रस्ताव प्राप्त झाले नंतर ते तपासून बँकेला पोहच देईल. संबंधित बँक आपलेकडे उपलब्ध असलेल्या दस्तऐवजावरून सदर विमा प्रस्तावाची पुर्नतपासणी करेल व यामध्ये काही दुरूस्ती आढळल्यास १५ दिवसांचे आत विमा कंपनीच्या निदर्शनास आणेल अन्यथा विमा कंपनीने पोहच दिलेले विमा प्रस्ताव अंतीम समजून त्यानुसार कार्यवाही करण्यात येईल व भविष्यात त्यामधील कोणतेही बदल स्वीकारले जाणार नाहीत.

१५. संबंधित बँकेने नुकसान भरपाई मिळालेल्या शेतकऱ्यांची यादी नोटीस बोर्डावर प्रसिध्द करणे आवश्यक आहे. तसेच प्राप्त झालेली नुकसान भरपाई रक्कम सर्व शेतकऱ्यांच्या बँक खात्यात जमा केले असल्याचे प्रमाणपत्र विमा कंपनीस पाठविणे आवश्यक आहे. तसेच नुकसान भरपाई पात्र शेतकऱ्यांची यादी विमा कंपनीच्या सहाय्याने पिक विमा पोर्टलवर प्रसिध्द करणे आवश्यक आहे.

१६. सर्व बँकांना विमा प्रस्तावाशी संबंधित असलेले सर्व दस्तऐवज संबंधित विमा कंपनीस तपासणीसाठी आवश्यकतेनुसार उपलब्ध करून द्यावे लागतील.

१७. बँकेने कोणताही शेतकरी योजनेच्या लाभापासून वंचित राहणार नाही याची खात्री करावी जर एखादा शेतकरी वित्तीय संस्थेच्या चुकीमुळे योजनेच्या लाभापासून वंचित राहीला तर सदर शेतकऱ्याला देय असणारी नुकसान भरपाई अदा करणेची जबाबदारी संबंधित बँकेची राहील.

१८. शेतकऱ्याची पूर्ण अर्ज भरण्याची जबाबदारी ही बँकेच्या शाखेची राहिल. जर एखादया शेतकऱ्याला अर्ज भरता येत नसेल तर सदर अर्ज शेतकऱ्यांच्या वतीने भरण्याची जबाबदारी बँकेच्या शाखेची राहिल, जेणेकरुन पिक विमा योजनेत सहभागी होऊ इच्छिणारा एकही शेतकरी पिक विमा संरक्षणापासून वंचित राहणार नाही.

१९. प्रतिकूल हवामानामुळे ज्या शेतक-यांचा विमा हप्ता संबंधित हवामान घटकाची अधिसूचना जारी होण्याच्या आत जमा झाला असेल / बँक खात्यातून वर्ग केलेला असेल त्यांनाच पात्र समजले जाईल. सबब बँकांनी कर्जदार शेतक-याचा विमा हप्ता पीक कर्ज मंजूरी/किसान क्रेडीट कार्डचे नुतनीकरण केल्यापासून १५ दिवसांच्या आत विमा कंपनीकडे देणे बंधनकारक आहे, अन्यथा अशा शेतक-यांच्या बाबतीत संभाव्य नुकसानभरपाईची सम्पूर्ण जबाबदारी संबंधीत बँकेची राहील. अशी परिस्थिती उद्भवू नये यासाठी बँकांनी विमा नोंदणीच्या अंतिम तारखेपुर्वी किमान एक महिना आधीच कर्जदार शेतक-यांचा विमा हप्ता विमा कंपनीकडे जमा करावा आणि त्यानंतर मंजूर केलेल्या कर्जखात्यांच्या बाबतीत दररोज विमा हप्ता जमा करावा.

२०. बँकांना जमा विमा हप्त्याचे ४ टक्के सेवा शुल्क देण्यात येते. त्यासाठी बिगर कर्जदार शेतकऱ्यांना विमा प्रस्ताव सादर करण्याबाबतीत बँकांनी आवश्यक ते सर्व सहकार्य करावयाचे आहे.

२१. बँकांनी कर्जदार व बिगर कर्जदार शेतक-यांचे विमा प्रस्ताव सादर करताना शेतक-याचे बँक खाते आधार कार्डशी सलग्न करणे अनिर्वाय आहे. या बाबतच्या आवश्यक त्या कागदपत्राची तपासणी संबंधीत बँकानी करावयाची आहे.

**<u>ई) कर्ज पुरवठा करणारी बँक/वित्तीय संस्था</u>**

१. पुनर्रचित हवामान आधारित फळ पिक विमा योजनेबाबत शेतकऱ्यांना मार्गदर्शन करणे

२. शेतकऱ्यांना विहीत प्रपत्रात विमा प्रस्ताव तयार करणेस मदत करणे आणि बिगर कर्जदार शेतकऱ्यांचे विविध कागदपत्र संकलित करणे.

३. विमा नोंदणी सुरु होण्यापुर्वी सर्व कर्जदार शेतक-यांचे आधार व मोबाईल क्रमांक प्राप्त करुन घेणे.

४. कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्यांची स्वतंत्र प्रपत्रात माहीती संकलित करुन ती विमा कंपनीस विमा हप्त्यासह वेळेत सादर करणे.

५. विमा कंपनी किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या प्रतिनिधी आणि जिल्हास्तरीय समन्वय समिती मार्फत करण्यात येणाऱ्या छाननी / पडताळणीसाठी विमा पॉलिसी प्रस्ताव व इतर आवश्यक कागदपत्रांचे जतन करावे.

६. आपल्या कार्यक्षेत्रामधील नोडल बँक आणि त्याअंतर्गत सेवा पुरविणाऱ्या इतर बँकाच्या कार्यालयामधील संबंधित अभिलेख व नोंदी या विमा कंपनीस उपलब्ध करून देण्यात याव्यात.

७. विमा संरक्षण घेणाऱ्या कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्यांची क्षेत्र व पिकांसंबधी आकडेवारीची नोंद ठेवणे.

८. पोर्टलवर विमा प्रस्ताव अपलोड करण्याच्या अंतिम तारखेपासून १५ दिवसांच्या आत आणि विमा कंपनीने मागणी केल्यापासून ७ दिवासांच्या आत विमा प्रस्तावांची माहिती संकलित व प्रमाणित करुन देणे.

९. विमा नोंदणीची मुदत संपण्यापुर्वी शेतक-यांचा विमा हप्ता कपात करुन घेणे व ती रक्कम संबंधित विमा कंपनीला थेट इलेक्ट्रॉनिक प्रणालीद्वारे हस्तांतरीत करणे.

१०. विमा कंपनीकडुन प्राप्त विमा नुकसानभरपाई रक्कम शेतक-यांच्या खात्यावर ७ दिवसांच्या आत जमा करणे व जी रक्कम अदा होऊ शकली नाही ती रक्कम प्राप्त झाल्यापासून १० कार्यालयीन दिवसांच्या आत कारणांसह संबंधित विमा कंपनीला परत करणे व त्याची माहिती केंद्र व राज्य शासनाला कळवणे.

११. प्रशासकीय व्यवस्थेमध्ये बँकेच्या शाखा या अंतिम सेवा केंद्रे मानण्यात आलेल्या आहेत. सबब सर्व कर्जदार शेतकरी आणि इच्छुक बिगर कर्जदार शेतकरी यांची पिक विमा नोंदणी करुन घेणे ही सर्व बँक शाखांची जबाबदारी आहे. यामध्ये हयगय अथवा चूकीची माहिती देण्यात आल्यास संबंधित बँक/बँक शाखा/प्राथमिक सेवा संस्था अशा चुकांमुळे देय फळपिक विमा दाव्यांना जबाबदार असतील.

फ) <u>जन सुविधा केंद्र - आपले सरकार केंद्र (सीएससी- एसपीव्ही)</u>

१. बिगर कर्जदार शेतक-यांची नोंदणी जनसुविधा केंद्रमार्फत सुनिश्चित करणे.

२. गाव पातळी वरील कर्मचारी यांना पिक विमा सहभाग वाढविण्यासाठी पोर्टलव्दारे अथवा जिल्हा पातळीवर काम करणा-या संबंधीत पिक विमा कंपनीव्दारे पिक विम्याविषयी प्रशिक्षण देणे.

३. जनसुविधा केंद्रामार्फत शेतक-यांकडून जमा केलेली विमा हप्त्याची रक्कम संबंधीत विमा कंपनीकडे शेतक-यांकडून प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून तीन दिवसांच्या आत ऑनलाईन जमा करणे.

४. जनसुविधा केंद्रामध्ये जमा झालेल्या विमा हप्त्यांचा अहवाल व शेतकरी सहभागाच्या गोषवा-यासह संबंधीत विमा कंपन्यांना दररोज सादर करणे.

५. राष्ट्रीय पिक विमा पोर्टलवर भरण्यात आलेली शेतकरी सहभागाची माहिती आणि संबंधीत विमा कंपनीला अदा केलेली विमा हप्ता रक्कम यांची पडताळणी विमा नोंदणीची अंतिम मुदत संपल्यावर ७ दिवसांच्या आत करणे.

६. हंगामासाठी निश्चित करण्यात आलेल्या प्रती शेतकरी सेवाशुल्काच्या दरानुसार सेवा शुल्काचे देयक संबंधीत विमा कंपनी कडे पुढील महिन्यातील १० तारखेस अथवा त्यापुर्वी सादर करणे.

७. विमाधारक शेतक-यांच्या तक्रार निवारण करणेसाठी व विमा पश्चात सेवा सुनिश्चित करणे.

८. राष्ट्रीय पिक विमा पोर्टलवर भरण्यात आलेली वैयक्तिक शेतक-यांची माहिती व सदर केलेली कागदपत्रे यामध्ये त्रुटी अथवा चुका आढळून आल्यास संबंधीत सेवा केंद्र जबाबदार असेल व अशा चुकांमुळे देय पिक विमा दाव्यांना जबाबदार राहील.

प) <u>जन-सुविधा केंद्रा वरील गावपातळी सेवक (व्हि.एल.ई.)</u>

१. शेतकरी विशेषतः बिगर कर्जदार शेतक-यांना योजने बाबत शिक्षित करणे व योजनेची वैशिष्ठ्ये समजावून सांगणे.

२. विमाकंपनी / राज्यशासना मार्फत योजनेच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी देण्यात आलेल्या जाहीराती, प्रचार साहित्य, बॅनर, पोस्टर, पत्रके इ. शेतक-यां पर्यंत पोहचवण्यासाठी कार्यक्षेत्रामध्ये ठळकपणे प्रसिद्ध करणे.

३. फक्त बिगर कर्जदार शेतक-यांचे विमा प्रस्ताव विहित प्रपत्रात आवश्यक कागदपत्रासह स्विकारणे व ऑनलाईन भरुन घेणे.

४. अंमलबजावणी करणा-या विमा कंपनीने मार्गदर्शक सुचनेच्या तरतुदीनुसार शेतकरी विमा हप्ता जमा करणे.

५. राष्ट्रीय पिक विमा पोर्टल वर बिगर कर्जदार शेतक-यांची माहिती मोबाईल नंबरसह योग्य तपशिल आवश्यक कागदपत्रासह अदयावत करणे व निश्चित कालावधीत जनसुविधा केंद्रामार्फत विमा हप्ता रक्कम जमा करणे. बिगर कर्जदार शेतक-यांचे पिक विमा प्रस्ताव भरतांना योग्य ती काळजी घेणे व जोडलेल्या कागदपत्राचा प्रस्तावाशी ताळमेळ घालणे.

६. विमा सहभाग नोंदवलेले शेतकरी काही त्रुटी, चुका अथवा विपरीत बाबीमुळे योजनेच्या फायदयापासून वंचित राहणार नाही यांची जनसुविधा केंद्रावरील गावपातळी सेवक (व्हिएलईज) यांनी खात्री करणे. जनसुविधा केंद्रावरील गावपातळी सेवक (व्हिएलईज) यांचे सेवेतील त्रुटी, गैरव्यवहार यामुळे योजनेच्या फायदयापासून शेतकरी वंचित राहील्यास त्यांचा अहवाल सादर करुन त्यांचे वर प्रशासकीय व कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल.

७. विमा धारक शेतक-यांना विमा पश्चात सेवा देणे तसेच पिक विमा दाव्यांची सुचना अथवा या संबंधीत तक्रारी असल्यास त्याबाबतची सुविधा निर्माण करणे.

८. जनसुविधा केंद्र शेतक-यांच्या वतीने विमा अर्ज भरतांना विमा प्रस्तावासाठी आवश्यक / गरजेची सर्व कागदपत्रे अपलोड करेल. आवश्यक कागदपत्रांशिवाय असलेले अर्ज विमा नुकसान भरपाईसाठी विचारात घेतले जाणार नाहीत व कागदपत्रांतील त्रुटींसाठी जनसुविधा केंद्राचे चालक जबाबदार असतील.

९. जन सुविधा केंद्रामार्फत विमा अर्ज दाखल करण्यासाठी शेतक-यांनी संबंधीत जनसुविधा केंद्र / विशेष हेतू वाहन यांना कोणतेही शुल्क / फी अदा करणे आवश्यक नाही.

**इ) <u>विमा प्रतिनिधींच्या भुमिका व जबाबदारी</u>**

१. पुनर्रचित हवामान आधारीत फळ पिक विमा योजनेबाबत शेतकऱ्यांना मार्गदर्शन करणे.

२. शेतकऱ्यांना विहीत प्रपत्रात विमा प्रस्ताव तयार करणेस मदत करणे आणि बिगर कर्जदार शेतकऱ्यांचे आधार क्रमांक आणि मोबाईल क्रमांकासह विविध कागदपत्र संकलीत करणे.

३. पुनर्रचित हवामान आधारीत फळ पिक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार विमा कंपनीचा प्रतिनिधी म्हणून विमा हप्ता गोळा करणे आणि त्याची पावती देणे.

४. बिगर कर्जदार शेतकऱ्यांची प्रपत्रात माहीती संकलित करुन ती विमा कंपनीस विमा हप्त्यासह वेळेत सादर करणे. अशा प्रकारे वेळेत माहिती सादर केलेले व विमा हप्ता रक्कम राष्ट्रीय पीक विमा पोर्टलवर विहित मुदतीत ईलेक्ट्रॉनिक पध्दतीने जमा केलेले अर्जच विमा संरक्षणास पात्र असतील.

५. संबंधीत विमा प्रतिनिधींनी योजनेत सहभागी झालेला शेतकरी योजनेतील लाभापासून वंचित राहणार नाही याची दक्षता घ्यावी. विमा प्रतिनिधीच्या त्रुटींमुळे/ दिरंगाईमुळे/हलगर्जीपणामुळे या योजनेच्या लाभापासून योजनेत सहभागी शेतकरी वंचित राहील्यास या संबंधात काही नुकसान भरपाई दयावयाची झाल्यास संबंधीत विमा कंपनीची जबाबदारी राहील. विमा प्रतिनिधीच्या सेवेमध्ये काही त्रूटी/चुका आढळल्यास त्यावर प्रशासकीय / कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल.

**य) <u>विमाधारक शेतकऱ्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या</u>**

**<u>कर्जदार शेतकऱ्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या</u>**

१. कर्जदार शेतकऱ्यांसाठी ही योजना बंधनकारक असल्याने सर्व कर्जदार शेतकऱ्यांनी त्यांच्या कर्ज मागणीच्या अर्जामध्ये नमूद केलेल्या पिकासाठी व क्षेत्रासाठी विमा संरक्षण घेणे बंधनकारक आहे.

२. कर्जदार शेतकऱ्यांचे विमा प्रस्ताव सुध्दा योजनेत सहभागी होण्याच्या अंतिम दिनांकापुर्वीच स्विकारले जातील.

३. सर्व कर्जदार शेतक-यांनी विमा नोंदणीच्या अंतिम मुदतीच्या आत संबंधीत बँकेकडे आपले आधार कार्ड व मोबाईल क्रमांक सादर अथवा प्रत्यक्ष ई-केवायसी करणे बंधनकारक आहे. सर्व बँकांनी आधार कायद्यानुसार प्रत्येक कर्ज खात्यासाठी संबंधित शेतक-याचा आधार क्रमांक घेणे बंधनकारक आहे.

४. विमा प्रस्ताव पुर्वनिश्चित तारखेपर्यंतच स्विकारले जातात. सबब सर्व कर्जदार शेतक-यांनी आपल्या बँकेकडे चौकशी करुन विमा प्रस्ताव दाखल झाल्याची खात्री करुन घेणे आवश्यक आहे.

५. कर्जदार शेतक-यांनी एकाच जमीनीवर विविध बँकांकडुन कर्ज घेणे, एकाहुन अधिक बँकांकडुन विमा प्रस्ताव दाखल करणे अथवा बिगर कर्जदार म्हणुनदेखील त्याच पिकाचा विमा हप्ता भरणे असे प्रकार करु नयेत. असे आढळल्यास विमा संरक्षण नाकारले जाऊन विमा हप्ता जप्त करण्यात येईल तसेच योग्य प्रशासकीय कार्यवाही देखील करण्यात येईल.

**<u>बिगर कर्जदार शेतकऱ्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या:</u>**

१. योजनेत सहभागी होऊ इच्छिणाऱ्या बिगर कर्जदार शेतकऱ्यांनी जवळच्या प्राधिकृत बँका / प्राथमिक कृषि पत पुरवठा सहकारी संस्था / संबंधित विमा कंपनीची कार्यालये किंवा विमा प्रतिनिधींशी संपर्क साधून विमा

प्रस्ताव विहीत प्रपत्रात योग्य त्या विमा हप्त्यासह तसेच आवश्यक त्या कागद पत्रासह विहीत वेळेत सादर करावीत.

२. अर्जदाराने आपल्या अर्जासोबत आधार कार्ड/आधार नोंदणीची प्रत, ७/१२ उतारा, भाडेपट्टा करार असलेल्या शेतकऱ्यांच्या करारनामा / सहमती पत्र, आणि बँक पासबुकाची प्रत सादर करुन प्रत्यक्ष ईलेक्ट्रॉनिक साक्षांकन करणे बंधनकारक आहे.

३. आपले सरकार सेवा केंद्रांद्वारे नोंदणी करणा-या शेतक-यांनी प्रस्तावासोबत आपला मोबाईल क्रमांक नमुद करुन आधार क्रमांकाचे स्वयंसाक्षांकन करणे बंधनकारक आहे.

४. बिगर कर्जदार शेतकऱ्यांनी संबंधित बँकेत स्वत:च्या नावे खाते उघडणे आवश्यक आहे.

५. शेतकऱ्यांनी विमा प्रस्तावामध्ये आपल्या जमिनीचा सर्व्हे नं. नमूद करावा.

६. शेतकऱ्यांनी धारण केलेल्या जमिनीचा पुरावा म्हणून ७/१२ उतारा तसेच शेतात अधिसुचित पीक असलेबाबत स्वयंघोषणा पत्र विमा प्रस्तावा सोबत देणे आवश्यक आहे. या योजनेंतर्गत नविन लागवड / फळधारणेसाठी आवश्यक वाढ न झालेल्या क्षेत्राचे अर्ज विमा संरक्षणाकरीता प्राप्त होत असल्याचे निदर्शनास येत आहे. तर काही फळपिकांसाठी मृग व आंबिया या दोनही बहारासाठी एकाच क्षेत्रावर विमा संरक्षणासाठी अर्ज भरण्यात येत आहेत. या अनुषंगाने सहपत्र - ४ च्या नमुन्यात सहभागी अर्जदार शेतकऱ्यांचे स्वयंघोषणापत्र विमा संकेत स्थळावर अर्जा सोबत जोडणे आवश्यक राहील.

७. शेतकऱ्यांनी अधिसुचित पिकासाठी एका क्षेत्रासाठी, एकाचवेळी अणि एकाच विमा कंपनीकडून विमा संरक्षण घेणे बंधनकारक आहे. जर त्याने एकाच क्षेत्रासाठी २ किंवा त्यापेक्षा अधिक विमा संरक्षण एकाच किंवा वेगवेगळया विमा कंपनीकडून घेतले तर त्याचा जमा विमा हप्ता जप्त करून त्याच्यावर कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल.

८. बिगर कर्जदार शेतकरी विमा संरक्षणासाठी वेब पोर्टलदवारे थेट अर्ज भरू शकतील .त्यासाठी पिक विमा पोर्टलवर (www.pmfby.gov.in) शेतक-यांसाठी ऑनलाईन अर्ज उपलब्ध करून दिलेला आहे. विमा हप्त्याची रक्कम ही पेमेंट गेटवे द्वारे ऑनलाईन भरावयाची आहे. अर्ज सदरच्या प्रणालीवर पूर्ण भरल्यानंतर विशेष ओळख क्रमांकासह पोचपावती मिळेल .तसेच शेतकऱ्यांच्या नोदणी केलेल्या मोबाईल नंबर वर ही एसएमएस दवारा सूचित केले जाईल..

९. तथापि बिगर कर्जदार शेतकऱ्यांनी स्वत:चे अर्ज संबंधित विमा कंपनीला किंवा पिक विमा पोर्टल द्वारे सादर करतांना त्यांच्याकडे संबंधीत विमा संरक्षित पिक तेवढ्या क्षेत्रावर असणे आवश्यक आहे तसेच त्यासंदर्भात राज्यस्तरीय समितीने ठरवून दिलेले कागदोपत्री पुरावे आणि आधार क्रमांक / आधार नोंदणी क्रमांक सादर करणे आवश्यक आहे. विमा प्रस्तावत नमूद करण्यात आलेली माहिती चुकीची अथवा अयोग्य असल्याचे नंतरच्या काळात केव्हाही आढळल्यास संबंधीत शेतकरी विमा हप्त्याची रक्कम आणि दाव्याचा (लागू असल्यास) हक्क गमावतील.

१०. शेतक-यांना अर्ज भरण्यासाठी बँकामध्ये होणारी गर्दी टाळता यावी व शेतक-यांना अर्ज भरण्यास सुलभता यावी म्हणुन मागील खरीप हंगामापासुन पुनर्रचित हवामान आधारीत फळपिक विमा योजनेत शेतकऱ्यांचे अर्ज / विमा हप्ता Common Service Centre (CSC) मार्फत ऑनलाईन पध्दतीने स्विकारण्यात येत आहेत.

याकरिता राज्यात सी.एस.सी. ई. गव्हर्नस सर्व्हिसेस इंडिया लिमिटेड द्वारे कार्यान्वीत “आपले सरकार सेवा केंद्र” (डिजीटल सेवा केंद्र) सुविधा शेतक-यांना प्रधानमंत्री पिक विमा योजनेचे अर्ज भरण्याकरीता उपलब्ध करण्यात आले आहेत. राज्यात कार्यान्वीत आपले सरकार प्राधिकृत सेवा केंद्र, कृषि विभागाने नियुक्त केलेल्या विमा कंपनीच्या वतीने शेतक-यांचे पिक विमा अर्ज भरण्यास मदत करतील व विमा हप्ता स्विकारतील या करिता प्राधिकृत आपले सरकार सेवा केंद्राचे चालक विमा योजनाचे अर्ज ऑन लाईन पध्दतीने भरतील. विमा अर्जा करिता आवश्यक कागदपत्रे जसे की, ७/१२ उतारा, आधार कार्ड, बँकखात्याचे तपशिल इत्यादी अर्जास ऑन लाईन पध्दतीने जोडतील. शेतक-यांना विमा अर्जाची प्रत, पोहोच उपलब्ध करुन देतील. त्यादृष्टिने संबंधित विमा कंपन्यांनी CSC मार्फत करार करणे बंधनकारक आहे. यासंदर्भात कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचेस्तरावरुन कळविण्यात येणा-या सूचना बंधनकारक राहतील.

राज्य शासनामार्फत राज्यात प्रत्येक महसुल मंडळस्तरावर स्वयंचलित हवामान केंद्र उभारण्यासाठी महावेध प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पांतर्गत हवामानाची आकडेवारी उपलब्ध होणार असुन त्यामुळे नुकसान भरपाई निश्चित होण्यास मदत होणार आहे. त्यानुसार प्रधानमंत्री पिक विमा योजनेंतर्गत लागणारी हवामानविषयक माहिती महावेध प्रकल्पाच्या अटी व शर्तीनुसार या प्रकल्पांतर्गत निश्चित केलेल्या स्कायमेट वेदर सर्व्हिसेस लि. या एजन्सीकडून घेणे विमा कंपनीला बंधनकारक राहील. महावेध प्रकल्पातर्गत हवामानाची आकडेवारी खरीप व रब्बी हंगामासाठी कमीत कमी ६ महिने कालावधी करिता रक्कम रु. ३२५०/- अधिक स्थानिक कर इतकी रक्कम विमा कंपन्यांना संबंधीत कंपनीकडे भरावी लागणार आहे. ६ महिन्या पेक्षा कमी कालावधी करीता हवामान विषयक माहिती आवश्यक असल्यास स्कायमेट वेदर सर्व्हिसेस लि. या कंपनीने निश्चित केलेल्या दराप्रमाणे विमा कंपनीस रक्कम भरावी लागेल.

११. "आधार" या ओळखपत्राच्या वापरातुन शासनामार्फत देण्यात येणा-या सेवा, सुविधा,लाभ व अनुदेय वितरण लाभार्थ्यांना करण्याच्या प्रक्रियेत सुलभता, पारदर्शकता, उत्तरदायित्व आणून योजनेचा लाभ थेट शेतक-यांना देण्याकरिता,केंद्र शासनाच्या दिनांक ०८ फेब्रुवारी, २०१७ चे राजपत्रान्वये खरीप हंगाम २०१७ पासून सदर योजनेअंतर्गत सहभागी होणाऱ्या सर्व कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्यांना आधार कार्ड प्रमाणिकरण करणे अनिवार्य केले आहे.

योजनेत सहभागासाठी शेतकऱ्यांचे आधारकार्ड सक्तीचे करण्यात आले असल्यामुळे सर्व बँकांनी आपल्या शेतक-यांचे आधार क्रमांक प्राप्त करणे आवश्यक आहे.सदर बाब बँकेमार्फत तसेच विमा कंपन्या व विमा मध्यस्थांमार्फत नोंदणी करणा-या बिगर कर्जदार शेतक-यांनाही लागू राहील. आधारकार्ड उपलब्ध नसल्यास पिक विमा योजनेत सहभागासाठी आधार नोंदणी करुन त्याचा पुरावा सादर करणे आवश्यक आहे.

सर्व बँकांनी आधार कायद्याच्या अधिसूचनेनुसार व्याजदर सवलत योजनेखाली पीक कर्ज / किसान क्रेडीट कार्ड मंजूर करतांना आधार / आधार नोंदणी क्रमांक घेणे बंधनकारक आहे.जेणेकरुन पुनर्रचित हवामान आधारित फळपिक विमा योजनेत आधार शिवाय कर्जदार शेतकरी सहभागी होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.संबंधीत बँक शाखांनी अशा खातेदारांचा वेळोवेळी आढावा घेणे आवश्यक आहे.

**१९) <u>निधी वितरणासाठी संगणकीय प्रणालीचा वापर</u>**

विमा हप्त्याचा राज्य हिस्सा कंपन्यांना वितरित करण्यासाठी शक्यतोवर सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) / पीएफएमएस लिंक्ड सिस्टीमचा वापर करण्याचा राज्य शासन प्रयत्न करेल.

बँका, सीएससी आणि विमा एजंटांना विमा हप्त्याचा भरणा राष्ट्रीय पीक विमा पोर्टलच्या पेमेंट-गेटवे (पे-जीओवी) च्या माध्यमातून किंवा आरटीजीएस / एनईएफटी द्वारे विमा कंपनीला करणे आवश्यक आहे. त्यानंतर विहित कालमर्यादेत सदर भरण्याचा तपशील राष्ट्रीय पीक विमा पोर्टलवर अपलोड करणे अनिवार्य राहिल. विमा कंपन्यांचे बँक तपशील राष्ट्रीय पीक विमा पोर्टलवरच उपलब्ध केले जातील. त्यानुसार, विमा कंपन्या, बँक शाखा, सीएससी आणि विमा एजंट्ससह सर्व भागधारकांनी या उद्देशासाठी समर्पित बँक खाती अनिवार्यपणे राखून ठेवली पाहिजेत. बँकर्स चेक / डिमांड ड्राफ्टच्या स्वरूपात कोणत्याही प्रेषणाची / आर्थिक व्यवहाराची परवानगी नाही.

**२०) <u>सेवाशुल्क</u>:**

- कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्याकडून जमा केलेल्या विमा हप्त्याच्या ४ टक्के रक्कम संबंधित विमा कंपनीकडून बँक सेवा शुल्क म्हणून बँकाना परस्पर देय होईल. पोर्टलवरील आकडेवारी निश्चित झाल्यानंतर १५ दिवसांच्या आत विमा कंपनीने सदर रक्कम अदा करावी.
- विमा प्रतिनिधींना विमा कंपनीने निश्चित केलेल्या दराने कमिशन दिले जाईल. तथापि, सदरचे कमिशन हे विमा नियामक प्राधिकरणाने निश्चित केलेल्या मर्यादेच्या आत असेल.
- विमा कंपनीकडुन सेवा शुल्क अदा करण्यास विलंब झाल्यास वार्षिक १२ टक्के व्याज देय राहील.
- ज्या विमा प्रस्तावांच्या बाबतीत अपुर्णता/चुका/विसंगती आढळुन येतील त्यासाठी सेवा शुल्क देय असणार नाही.
- आपले सरकार सेवां केंद्रांना केंद्र शासनाने निश्चित केलेल्या दरानुसार विमा कंपन्यांनी सेवाशुल्क अदा करावे.

**२१) वस्तू व सेवा कर <u>(Goods and Service Tax-GST) :</u>**

पुनर्रचित हवामान आधारित फळपिक विमा योजनेला वस्तु व सेवा करातून वगळण्यात आले आहे.

२२) <u>नियंत्रण अधिकारी व आहरण संवितरण अधिकारी</u> :

या योजनेसाठी आयुक्त, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे नियंत्रण अधिकारी राहतील. तसेच सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. याशिवाय केंद्र शासनाने सदर योजनेकरिता वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सुचना मधील सर्व अटी व शर्ती योजनेतील सर्व सहभागीदाराकरिता लागू राहील.

२३) सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखालील दिनांक २०/०८/२०१९ व ३०/१०/२०१९ रोजी झालेल्या राज्यस्तरीय पीक विमा समन्वय समितीच्या सभेत दिलेल्या मंजूरीनूसार व केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

२४) भारतीय कृषि विमा कंपनी मार्फत योजनेत सहभागी होणाऱ्या शेतकऱ्यांना द्यावयाच्या अनुदानासाठी राज्य शासनाच्या हिस्सा पोटी देय होणारी रक्कम खालील लेखाशिर्षा खालील अर्थ संकल्पीय तरतुदीतुन भागविण्यात यावी.

मागणी क्रमांक डी- ३
लेखाशिर्ष २४०१ - पीक संवर्धन
११० (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना,
(००) (०७) पुनर्रचित हवामान आधारीत पिक विमा योजना
(२४०१ ९४०२), ३३ अर्थसहाय्य

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९१०३११२२२१०२००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN N PATIL

Digitally signed by KIRAN N PATIL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=657661007c4f6885bf8deae62f13606632589e592d8c18ce
b9a49bfd30471850, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=64a3950913946fa68fe576faead463fd8ae1e3844a8
20d921b663674927a476e, ou=AGRICULTURE DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KIRAN N PATIL
Date: 2019.10.31 12:24:46 +05'30'

**( डॉ. किरण पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**सहपत्र: परिशिष्ट.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा.मंत्री ( कृषि) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधीपक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. मा. विरोधीपक्षनेता, विधान परिषद, विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
७. मा.अप्पर मुख्य सचिव ( कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक
८. मा.अपर मुख्य सचिव ( वित्त ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
९. मा.अपर मुख्य सचिव ( नियोजन ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१०. प्रधान सचिव ( महसूल व वन ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
११. सचिव ( सहकार ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१२. सचिव, कृषि मंत्रालय, भारत सरकार ( कृषि व सहकार विभाग )कृषि भवन, नवी दिल्ली (पत्राने)
१३. सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार ( वित्त विभाग ) (विमा) नवी दिल्ली ( पत्राने )
१४. संचालक, पिक विमा भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली.

१५. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी मर्यादित, नवीन स्टॉक एक्सचेंज बिल्डींग, २० वा मजला, दलाल स्ट्रीट, मुंबई-४०० ०२३
१७. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
१८. सर्व विभागीय आयुक्त,
१९. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई - ३२.
२०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२१. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र नागरी बॅका ९ नगीनदास रोड, मुंबई-२३
२२. महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर , शिवसागर इस्टेट, वरळी, मुंबई
२३. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
२४. विमा संचालक, म्हाडा इमारत, पहिला मजला, बांद्रा पूर्व, मुंबई
२५. संचालक, माहिती आणि प्रसिध्दी (प्रसिध्दीसाठी ) मंत्रालय, मुंबई
२६. संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-०५
२७. संचालक, मृद संधारण, नियोजन, विस्तार व प्रशिक्षण, साखर संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ०५.
२८. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
२९. सर्व जिल्हाधिकारी,
३०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
३१. सर्व व्यवस्थापक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅक,
३२. सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य,
३३. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर, ५४ वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे-५
३४. सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक , ९ नगीनदास रोड, मुंबई- २३
३५. मुख्य अधिकारी, सेंट्रल फायनान्स एजन्सी, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक, ९ नगीनदास रोड, मुंबई- २३
३६. मुख्य अधिकारी, ग्रामीण नियोजन व पत विभाग, रिझर्व्ह बॅक ऑफ इंडिया, फोर्ट, मुंबई
३७. व्यवस्थापक, महाराष्ट्र बॅक १५०१, लोकमंगल, शिवाजीनगर, पुणे-५.
३८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
३९. सर्व सहसचिव /उपसचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई ०३२
४०. उपसचिव, नियोजन विभाग (कार्या.१४३१) / वित्त विभाग (व्यय-१)
४१. उपसचिव (अर्थसंकल्प), उपसचिव (१२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई - ०३२
४२. निवडनस्ती -१० अे.

## सहपत्र - १

सन २०१९-२० पुनर्रचित हवामान आधारित फळपिक विमा योजना राबविण्याकरिता प्रस्तावित जिल्हे, तालुके व महसूल मंडळाची यादी.

| अ.क्र. | फळपीक | जिल्हा | तालूके | महसूल मंडळ |
|---|---|---|---|---|
| १ | द्राक्ष | सांगली | मिरज | मिरज, बुधगाव, कसबे-डिग्रज, कवलापूर, मालगाव, आरग, सांगली |
| | द्राक्ष | सांगली | कडेगांव | कडेगांव, शाळगाव, नेवरी, वांगी, चिंचणी |
| | द्राक्ष | सांगली | वाळवा | वाळवा, इस्लामपूर, आष्टा, ताकारी, कोरेगाव |
| | द्राक्ष | सांगली | खानापुर | विटा, लेंगरे, भाळवणी, खानापूर, करंजे |
| | द्राक्ष | सांगली | पलूस | पलूस, कुंडल, भिलवडी, अंकलखोप |
| | द्राक्ष | सांगली | जत | जत, डफळापूर, कुंभारी, मुचंडी, शेगाव, माडग्याळ, उमदी, संख |
| | द्राक्ष | सांगली | तासगांव | तासगाव, विसापूर, सावळज, मणेराजूरी, येळावी, मांजर्डे |
| | द्राक्ष | सांगली | आटपाडी | खरसुंडी, दिघंची |
| | द्राक्ष | सांगली | कवठेमंहाकाळ | कवठेमंहाकाळ, कुची, ढालगाव, देशींग, हिंगणगाव |
| | द्राक्ष | सोलापूर | उत्तर सोलापूर | उ.सोलापुर, शेळगी, वडाळा, मार्डी, तिऱ्हे |
| | द्राक्ष | सोलापूर | दक्षिण सोलापूर | बोरामणी, मुस्ती, वळसंग, मंद्रूप, विंचूर, निंबर्गी, होटगी |
| | द्राक्ष | सोलापूर | बार्शी | बार्शी, खांडवी, आगळगांव, पांगरी, पानगांव, सुर्डी, वैराग, नारी, उपळेदुमाला, गौडगांव |
| | द्राक्ष | सोलापूर | अक्कलकोट | अक्कलकोट, जेऊर, तडवळ, करजगी, दुधनी, मैदर्गी, वागदरी, चपळगांव, किणी |
| | द्राक्ष | सोलापूर | मोहोळ | मोहोळ, नरखेड, शेटफळ, पेनुर, वाघोली, कामती बु., सावळेश्वर, टाकळीसिकंदर |
| | द्राक्ष | सोलापूर | माढा | माढा, दारफळ, कुर्डुवाडी, टेंभूर्णी, मोडनिंब, लऊळ, रोपळे क., म्हैसगाव, रांझणी. |
| | द्राक्ष | सोलापूर | करमाळा | जेऊर, केम, करमाळा, उमरड, अर्जूननगर, सालसे, केतूर |
| | द्राक्ष | सोलापूर | पंढरपुर | पंढरपूर, भंडीशेगांव, भाळवणी, करकंब, पटकुरोली, पुळूज, चळे, तुंगत, कासेगांव |
| | द्राक्ष | सोलापूर | सांगोला | सांगोला, शिवणे, जवळा, हतीद, सोनंद, कोळा, नाझरा, महुद बु., संगेवाडी, सांगोला श. |
| | द्राक्ष | सोलापूर | माळशिरस | माळशिरस, इस्लामपूर, पिलिव, वेळापूर, सदाशिवनगर |
| | द्राक्ष | सोलापूर | मंगळवेढा | मंगळवेढा, बोराळे, आंधळगाव, भोसे, हुलजंती, मरवडे, मारापूर |
| | द्राक्ष | नाशिक | नाशिक | नाशिक, माडसांगवी, मखमलाबाद, सातपूर, पाथर्डी, गिरनारे, देवळाली, शिंदे |
| | द्राक्ष | नाशिक | दिंडोरी | दिंडोरी, मोहाडी, उमराळे (बु.), ननाशी, कोशींबे, वणी, वरखेडा |
| | द्राक्ष | नाशिक | मालेगाव | मालेगाव, दाभाडी, निमगाव, वडनेर, सौंदाणे, सायने बु.. |
| | द्राक्ष | नाशिक | इगतपूरी | वाडीवरे |
| | द्राक्ष | नाशिक | निफाड | निफाड, पिंपळगाव, ब.रानवड, लासलगाव, चांदोरी, देवगाव, सायखेडा, ओझर, नांदुर-मधमेश्वर |
| | द्राक्ष | नाशिक | त्र्यंबकेश्वर | त्र्यंबकेश्वर, वेळुंजे |
| | द्राक्ष | नाशिक | सिन्नर | सिन्नर, पाढुर्ली, देवपूर, वावी, शहा, नांदुरशिंगोटे |
| | द्राक्ष | नाशिक | येवला | पाटोदा, जळगाव नेऊर, येवला, अंदरसुल, सावरगाव, नगरसुल. |
| | द्राक्ष | नाशिक | चांदवड | चांदवड, दिघवद, वडनेरभैरव, वडाळीभोई, दुगाव, रायपूर |

| | | | |
|---|---|---|---|
| द्राक्ष | नाशिक | नांदगाव | हिसवळ (बु.) |
| द्राक्ष | नाशिक | कळवण | कळवण, मोकभणगी, नवीबेज |
| द्राक्ष | नाशिक | देवळा | देवळा, लोहनेर |
| द्राक्ष | नाशिक | सटाणा (बागलाण) | नामपूर, जायखेडा, ताहाराबाद, मुल्हेर, विरगाव, डांगसौदाने, ब्राम्हणगाव, सटाणा (बागलाण) |
| द्राक्ष | पुणे | दौंड | यवत, राहू, पाटस |
| द्राक्ष | पुणे | आंबेगाव | कळंब, मंचर, पारगाव, घोडेगाव |
| द्राक्ष | पुणे | बारामती | बारामती, वडगाव निंबाळकर, माळेगाव बु., पणदरे |
| द्राक्ष | पुणे | जुन्नर | जुन्नर, नारायणगाव, निमगावसावा, बेल्हे, वडगाव आनंद, राजूर, डिंगोरे, ओतूर, आपटाळे |
| द्राक्ष | पुणे | इंदापुर | इंदापूर, बावडा, भिगवण, सणसर, निमगाव केतकी, लोणीदेवकर, काटी, अंथुर्णे |
| द्राक्ष | अहमदनगर | अहमदनगर | नागापूर |
| द्राक्ष | अहमदनगर | श्रीगोंदा | बेलवंडी, चिंभळा, श्रीगोंदा, पेडगाव, काष्टी, देवदैठण, कोळगाव, मांडवगण |
| द्राक्ष | अहमदनगर | संगमनेर | संगमनेर(बु), घारगाव, धांदरफळ (बु.) |
| द्राक्ष | अहमदनगर | कोपरगाव | रवंदे, सुरेगाव, कोपरगाव, दहेगाव बोलका, पोहेगाव |
| द्राक्ष | अहमदनगर | राहाता | राहाता, लोणी, बाभळेश्वर, पुणतांबा, शिर्डी |
| द्राक्ष | अहमदनगर | श्रीरामपूर | उंदीरगाव, श्रीरामपूर |
| द्राक्ष | अहमदनगर | कर्जत | कर्जत, राशीन, भांबोरा |
| द्राक्ष | अहमदनगर | राहुरी | ताहाराबाद |
| द्राक्ष | अहमदनगर | जामखेड | नान्नज |
| द्राक्ष | अहमदनगर | अकोले | विरगाव |
| द्राक्ष | लातूर | रेणापूर | कारेपूर |
| द्राक्ष | लातूर | औसा | औसा, लामजणा, किनीथोट, किल्लारी, बेलकुंड, भादा |
| द्राक्ष | लातूर | उदगीर | मोघा, देवर्जन |
| द्राक्ष | लातूर | चाकूर | नळेगाव, शेळगाव |
| द्राक्ष | लातूर | निलंगा | निलंगा, औराद शहाजाणी, आबूलगा, कासार, बालकुदा |
| द्राक्ष | उस्मानाबाद | उस्मानाबाद | उस्मानाबाद श., उस्मानाबाद ग्रा., बेंबळी, केसेगाव, पाडोळी, तेर, ढोकी, जागजी |
| द्राक्ष | उस्मानाबाद | तुळजापूर | तुळजापूर, सावरगाव, सलगरा दि, ईटकळ, जळकोट, मंगरुळ, नळदुर्ग |
| द्राक्ष | उस्मानाबाद | भूम | भूम, वालवड, माणकेश्वर, अंभी, ईट |
| द्राक्ष | उस्मानाबाद | परंडा | परंडा, आसु, जवळा नि, आनाळा, सोनारी |
| द्राक्ष | उस्मानाबाद | कळंब | कळंब, इटकूर, येरमाळ, मोहा, शिराढोण, गोंविदपूर |
| द्राक्ष | उस्मानाबाद | उमरगा | उमरगा, दाळींब, नारंगवाडी, मुळज, मुरुम |
| द्राक्ष | उस्मानाबाद | वाशी | वाशी, तेरखेडा, पारगाव |
| द्राक्ष | उस्मानाबाद | लोहारा | लोहारा, माकणी, जेवळी |
| द्राक्ष | जालना | जालना | वाघुळ जां., जालना (ग्रा.), रामनगर, पाचन वडगाव, जालना (श), नेर, सेवली, विरेगाव |
| द्राक्ष | जालना | बदनापूर | बदनापूर, शेतलगाव, रोषणगाव, बावणेपांगरी, दाभाडी |
| द्राक्ष | जालना | जाफ्राबाद | टेंभुर्णी |
| द्राक्ष | जालना | अंबड | जामखेडा, रोहीलागढ, सुखारपुरी, धनगरपिंपरी, वडीगोद्री |
| द्राक्ष | जालना | भोकरदन | भोकरदन, सिपोरा बाजार, हसनाबाद, राजूर, केदारखेडा, पिंपळगाव रे., आन्वा, धावडा. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | द्राक्ष | जालना | परतूर | श्रीष्टी |
| | द्राक्ष | जालना | घनसावंगी | रानीउंचेगाव |
| | द्राक्ष | जालना | मंठा | ढोकसाळ |
| | द्राक्ष | बीड | केज | केज |
| | द्राक्ष | बीड | अंबेजोगाई | पाटोदा म, घाटनांदुर, बर्दापुर |
| | द्राक्ष | बीड | परळी वै. | परळी वै., सिरसाळा, नागापूर, धर्मापुरी, पिंपळगाव गाढे. |
| | द्राक्ष | सातारा | खटाव | कलेढोण, कातरखटाव, वडूज, मायणी, निमसोड, बुध |
| | द्राक्ष | सातारा | कोरेगाव | कोरेगाव, वाठार स्टे., पिंपोडे(बु) |
| | द्राक्ष | सातारा | कराड | सैदापूर, शेणोली, उंडाळे. |
| | द्राक्ष | सातारा | माण | म्हसवड |
| | द्राक्ष | कोल्हापूर | पन्हाळा | कळे |
| | द्राक्ष | कोल्हापूर | हातकणंगले | हातकणंगले, वडगाव |
| | द्राक्ष | कोल्हापूर | शिरोळ | नांदणी, जयसिंगपूर |
| | द्राक्ष | धुळे | धुळे | धुळे ( शहर), शिरुड, बोरकुंड, आर्वि, सोनगिर, नगांवबु, फागणे, मुकटी, धुळे ग्रामीण, कुसुबा, नेर , लामकानी |
| | द्राक्ष | धुळे | शिंदखेडा | शिंदखेडा, चिमठाणे, शेवाळे, खलाणे, नरडाणे, बेटावद, वर्षी, दोंडाईचा, विखरण, विरदेल |
| | द्राक्ष | धुळे | साक्री | साक्री, कासारे, म्हसदी प्रने, दुसाने, निजामपूर, ब्राम्हणवेल, पिंपळनेर, दहीवेल, कुडाशी, उमरपाटा |
| | द्राक्ष | धुळे | शिरपूर | शिरपूर, बोराडी, अर्थे, जवखेडे, होळेनाथे, थाळनेर, सांगवी |
| | द्राक्ष | औरंगाबाद | पैठण | पैठण, लोहगाव |
| | द्राक्ष | औरंगाबाद | गंगापूर | वाळूज, शेंदुरवाडा |
| | द्राक्ष | औरंगाबाद | कन्नड | कन्नड, चिखलठाण, चापानेर, चिंचोळी, करंजखेडा, देवगाव रंगारी |
| | द्राक्ष | औरंगाबाद | औरंगाबाद | कांचनवाडी, हर्सुल (वरुडकाजी), चिखलठाणा, चित्तेपिंपळगाव, करमाड, लाडसावंगी, चौका |
| | द्राक्ष | नांदेड | नांदेड | तरोडाबु, तुप्पा, वसरणी, लिंबगांव, विष्णूपूरी |
| | द्राक्ष | नांदेड | अर्धापुर | अर्धापूर, दाभड, मालेगांव |
| | द्राक्ष | नांदेड | मुदखेड | मुदखेड, मुगट, बारड |
| | द्राक्ष | नांदेड | हादगांव | हादगांव, तामसा, मनाठा, आष्टी |
| | द्राक्ष | नांदेड | लोहा | शेवडी बा. |
| | द्राक्ष | नांदेड | भोकर | भोकर |
| | द्राक्ष | नांदेड | देगलूर | मरखेल, हाणेगांव |
| | द्राक्ष | बुलढाणा | बुलढाणा | बुलढाणा |
| | द्राक्ष | बुलढाणा | मोताळा | बोराखेडी |
| | द्राक्ष | बुलढाणा | जळगांव | जळगांव ( जा ) |
| | द्राक्ष | बुलढाणा | संग्रामपूर | बावनपीर, सोनाळा |
| | द्राक्ष | बुलढाणा | देऊळगांव राजा | देऊळगांव राजा |
| २ | मोसंबी | औरंगाबाद | खुलदाबाद | वेरुळ, सुलतानपूर |
| | मोसंबी | औरंगाबाद | सिल्लोड | गोळेगाव, निल्लोड, सिल्लोड |
| | मोसंबी | औरंगाबाद | कन्नड | देवगाव रंगारी, चापानेर, चिंचोली, करंजखेडा, चिकलठाणा, कन्नड |
| | मोसंबी | औरंगाबाद | सोयगाव | सावळद बारा, सोयगाव, बनोटी |
| | मोसंबी | औरंगाबाद | औरंगाबाद | करमाड, लाडसावंगी, चित्ते पिंपळगाव, चौका, कांचनवाडी, चिकलठाणा, हार्सुल. |
| | मोसंबी | औरंगाबाद | पैठण | पैठण, नांदर, विहामांडवा, पिंपळवाडी पीराची, ढोरकीन, लोहगाव, बीडकीन, पाचोबु, आडुळ, बालानगर. |
| | मोसंबी | औरंगाबाद | वैजापूर | वैजापूर, खंडाळा, लाडगाव, गारज, महालगाव, नागमठान, बोरसर, शिऊर, लोनी खु., लासुरगाव. |
| | मोसंबी | औरंगाबाद | गंगापूर | गंगापूर, हार्सुल, वाळुंज, तुरकाबाद, सि. वडगाव, मांजरी, डोणगाव शेंदुरवाडा, |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | भेंडाळा. |
| मोसंबी | औरंगाबाद | फुलंब्री | फुलंब्री |
| मोसंबी | जालना | जालना | जालना (श), जालना (ग्रा), रामनगर, नेर, विरेगाव, पाचनवडगाव, वाघ्रुळ (जहांगिर), शेवली. |
| मोसंबी | जालना | भोकरदन | भोकरदन, हसनाबाद, राजूर, केदारखेडा, पिंपळगाव रे., सिपोराबाजार, आन्वा, धावडा. |
| मोसंबी | जालना | जाफ्रराबाद | जाफ्रराबाद, माहोरा, कुंभारझरी, टेंभुर्णी, वरुड(बु). |
| मोसंबी | जालना | बदनापूर | बदनापूर, शेलगाव, दाभाडी, बावनेपांगरी, रोशनगाव |
| मोसंबी | जालना | अंबड | अंबड, धनकर पिप्री, जामखेडा, रोहीलागड, वडीगोद्री, सुखापूरी, गोंदी |
| मोसंबी | जालना | घनसावंगी | घनसावंगी, राणी उचेगाव, कुंभार पिंपळगाव, तिर्थपूरी, अंतरवली टेंभी, जामसमर्थ, रांजणी |
| मोसंबी | जालना | परतूर | परतूर, वाटूर, सातोना खु, श्रीष्टी, आष्टी |
| मोसंबी | जालना | मंठा | मंठा, पांगरी गोसावी, तळणी, ढोकसाळ |
| मोसंबी | अहमदनगर | शेवगांव | चापडगांव, बोधेगाव, एरंडगाव, भातकुडगाव, शेवगाव |
| मोसंबी | अहमदनगर | पाथर्डी | करंजी, पाथर्डी, टाकळी मानुर, मिरी, कोरडगाव |
| मोसंबी | अहमदनगर | श्रीगोंदा | बेलवंडी, देवदैठण, चिंभळा, कोळगाव |
| मोसंबी | अहमदनगर | नेवासा | सलाबतपुर |
| मोसंबी | नांदेड | नांदेड | लिंबगांव, विष्णूपुरी |
| मोसंबी | नांदेड | मुदखेड | बारड |
| मोसंबी | नांदेड | अर्धापुर | मालेगाव |
| मोसंबी | परभणी | परभणी | परभणी, झरी |
| मोसंबी | परभणी | पाथरी | पाथरी, हादगाव(बु) |
| मोसंबी | परभणी | मानवत | मानवत, केकरजवळा, कोल्हा |
| मोसंबी | परभणी | सेलू | सेलू, वालुर |
| मोसंबी | परभणी | पुर्णा | चुडवा, लिमला |
| मोसंबी | परभणी | जिंतूर | जिंतूर, बोरी |
| मोसंबी | बीड | बीड | बीड, नाळवंडी, पाली, म्हाळास जवळा, मांजरसुंबा, चौसाळा, पेंडगाव, नेकनुर, पिपंळनेर, राजुरी ऩ. लिंबागणेश |
| मोसंबी | बीड | गेवराई | गेवराई, तलवडा, धोडराई, उमापुर, चकलांबा, मादळमोही, पाचेगाव, जातेगाव, तलवाडा, रेवकी, सिरसदेवी, राजुरी नवगण |
| मोसंबी | बीड | माजलगांव | माजलगांव, किट्टीआडगांव, नित्रुड, तालखेडा |
| मोसंबी | बीड | अंबेजोगाई | पाटोदा, घाटनांदूर, लो.सावरगाव, बर्दापुर. |
| मोसंबी | बीड | पाटोदा | पाटोदा |
| मोसंबी | बीड | आष्टी | कडा, धामणगाव |
| मोसंबी | बीड | शिरुर (का.) | शिरूर (का.), तिंतरवणी, रायमोहा |
| मोसंबी | बीड | धारूर | धारूर, मोहखेड |
| मोसंबी | बीड | वडवणी | वडवणी, कवडगाव. |

| | | | |
|---|---|---|---|
| मोसंबी | अमरावती | अमरावती | बडनेरा, डवरगांव, माहुली जहांगिर, नांदगाव पेठ |
| मोसंबी | अमरावती | वरुड | वरुड, शेंदुरजनाघाट, लोणी, पुसळा, बेनोडा, वाठोडा, राजूराबाजार |
| मोसंबी | अमरावती | मोर्शी | मोर्शी, हिवरखेड, शिरखेड, अंबाडा, नेरपिंगळाई |
| मोसंबी | अमरावती | तिवसा | वरखेड, वऱ्हा, मोझरी |
| मोसंबी | अमरावती | धामणगांव रेल्वे | धामणगांव रेल्वे, चिंचोली, अंजन सिंगी |
| मोसंबी | बुलढाणा | सिंदखेड राजा | सिंदखेड राजा, सोनोशी, किनगाव राजा, दुसरबीड, मलकापूर पांगरा, शेंदुरजन, साखरखेर्डा |
| मोसंबी | बुलढाणा | देऊळगांव राजा | तुळजापूर |
| मोसंबी | नागपूर | नागपूर ग्रा | वाडी |
| मोसंबी | नागपूर | काटोल | काटोल, मेटपांजरा, येनवा, कोंढाळी, पारडसिंगा, रिधोरा |
| मोसंबी | नागपूर | नरखेड | नरखेड, सावरगाव, जलालखेडा, मोवाड, मेंढला, भिष्णूर |
| मोसंबी | नागपूर | सावनेर | केळवद, खापा, सावनेर, पाटणसावंगी, बढेगांव |
| मोसंबी | नागपूर | कळमेश्वर | कळमेश्वर, मोहपा, धापेवाडा, तेलकामठी |
| मोसंबी | वर्धा | कारंजा | कारंजा, सारवाडी, कन्नमवार, ठाणेगांव |
| मोसंबी | वर्धा | आष्टी | साहुर, आष्टी, तळेगांव |
| मोसंबी | उस्मानाबाद | उस्मानाबाद | उस्मानाबाद  ग्रा., जागजी |
| मोसंबी | उस्मानाबाद | तुळजापूर | तुळजापूर, सावरगाव, सलगरादि, ईटकळ, जळकोट, मंगरूळ, नळदुर्ग |
| मोसंबी | उस्मानाबाद | भूम | वालवड, माणकेश्वर, अंभी, ईट |
| मोसंबी | उस्मानाबाद | लोहारा | लोहारा |
| मोसंबी | उस्मानाबाद | परांडा | परांडा, आसु, जवळानि. अनाळा, सोनारी |
| मोसंबी | उस्मानाबाद | वाशी | वाशी, तेरखेडा, पारगाव |
| मोसंबी | हिंगोली | हिंगोली | हिंगोली, सिरसम बु, खंबाळा, मालहिवरा, नर्सी ना, बासंबा, डिग्रस |
| मोसंबी | हिंगोली | औंढानागनाथ | औंढा ना.साळण, जावळाबाजार, येहळेगाव |
| मोसंबी | हिंगोली | सेनगाव | गोरेगाव, साखर, हत्ता, आजेगाव |
| मोसंबी | हिंगोली | कळमनुरी | कळमनुरी, आबाळापूर, नांदापूर, वाकोडी, वारंगाफाटा, डोंगरकडा |
| मोसंबी | हिंगोली | बसमत | हयातनगर, चोंढी, आंबा, टेंभुर्णी, हटटा, गिरगाव |
| मोसंबी | सोलापूर | बार्शी | बार्शी, आगळगांव, पांगरी, नारी, खांडवी, पानगाव, सुर्डी, वैराग, उपळेदु. |
| मोसंबी | सोलापूर | अक्कलकोट | मैंदर्गी. |
| मोसंबी | सोलापूर | मोहोळ | मोहोळ, शेटफळ, टाकळीसिकंदर. |
| मोसंबी | सोलापूर | माढा | माढा, दारफळ, म्हैसगांव, कुर्डुवाडी, टेंभूर्णी, मोडनिंब. |
| मोसंबी | सोलापूर | करमाळा | करमाळा, जेऊर, उंमरड, केम, कोर्टी, अर्जूननगर, सालसे |
| मोसंबी | सोलापूर | पंढरपुर | पंढरपूर, भंडीशेगांव, भाळवणी, करकंब, पटकुरोली, पुळूज, चळे, तुंगत, कासेगांव |
| मोसंबी | सोलापूर | सांगोला | सांगोला, शिवणे, जवळा, हतीद, सोनंद, कोळे, नाझरे, महुदबु., संगेवाडी. |
| मोसंबी | जळगांव | जळगांव | जळगाव, भोकर, पिंप्राळा, नशिराबाद, म्हसावद, आसोदा |
| मोसंबी | जळगांव | पारोळा | पारोळा, शेळावे, चोरवड, तामसवाडी, बहादरपुर |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | मोसंबी | जळगांव | एरंडोल | एरंडोल, उत्राण (घा.) |
| | मोसंबी | जळगांव | भडगांव | भडागाव, कोळगाव, कजगाव, आमडदे |
| | मोसंबी | जळगांव | पाचोरा | नगरदेवळा, गाळण, वरखेडी, पिंपळगाव |
| | मोसंबी | जळगांव | जामनेर | जामनेर, नेरी, मालदाभाडी, पहूर, शेदूर्णी, तोंडापुर, फत्तेपुर, वाकडी |
| | मोसंबी | जळगांव | चाळीसगाव | मेहूणबारे, चाळीसगाव, शिरसगाव, बहाळ, हातले, खडकी बु, तळेगाव |
| | मोसंबी | जळगांव | चोपडा | लासुर, हातेड |
| | मोसंबी | जळगांव | धरणगाव | धरणगाव |
| | मोसंबी | पुणे | इंदापुर | काटी |
| | मोसंबी | अकोला | पातुर | पातुर |
| ३ | डाळिंब | बुलढाणा | चिखली | पेठ, चिखली, चांधई, हातणी, धोडप, अमडापूर, एकलारा, ऊंद्री, कोलारा, शे. अटोळ, मेरा खु.. |
| | डाळिंब | बुलढाणा | बुलढाणा | बुलढ़ाणा, धाड |
| | डाळिंब | बुलढाणा | मोताळा | शेलापुर, बोराखेडी, मोताळा, धामणगाव बढे. |
| | डाळिंब | बुलढाणा | खामगांव | हिवरखेड, काळेगांव, पि. राजा |
| | डाळिंब | बुलढाणा | सिंदखेड राजा | सिंदखेड राजा, दुसरबिड, शेदुर्जन, साखरखेर्डा |
| | डाळिंब | बुलढाणा | देऊळगांव राजा | देऊळगाव राजा, तुळजापुर, मेहूणा राजा, दे. मही, अंढेरा |
| | डाळिंब | बुलढाणा | जळगांव जा. | जामोद, पि. काळे |
| | डाळिंब | बुलढाणा | मलकापूर | जाभूळ धाबा, नरवेल |
| | डाळिंब | बुलढाणा | लोणार | लोणार |
| | डाळिंब | बुलढाणा | मेहकर | डोनगाव, हिरवा आश्रम, शेलगाव(दे), ना.दत्तापुर |
| | डाळिंब | जळगांव | चाळीसगाव | चाळीसगांव, शिरसगांव, बहाळ, मेहूणबारे, हातले, तळेगांव, खडकी बु., खडकी |
| | डाळिंब | जळगांव | पाचोरा | पाचोरा, नांद्रा, नगरदेवळा, गाळण, वरखेडी बु., पिंपळगांव बु.. |
| | डाळिंब | जळगांव | जळगांव | नाशिराबाद, जळगाव, आसोदा, भोकर, पिंप्राळा, म्हसावद |
| | डाळिंब | जळगांव | पारोळा | पारोळा, तामसवाडी, चोरवड, शेळावे, बहादरपुर. |
| | डाळिंब | जळगांव | भुसावळ | वरणगांव, पिंपळगांव खु.. |
| | डाळिंब | जळगांव | रावेर | रावेर, खानापुर, ऐनपुर, खरोदा प्र. या. |
| | डाळिंब | जळगांव | बोदवड | बोदवड |
| | डाळिंब | जळगांव | मुक्ताईनगर | अंतुर्ली, मुक्ताईनगर, कुऱ्हे. |
| | डाळिंब | जळगांव | अमळनेर | अमळनेर, शिरूड, नगाव, पातोंडा, अंमळगाव, मारवड, भरवस, वावडे |
| | डाळिंब | जळगांव | चोपडा | अडावद, चोपडा, लासूर, चहार्डी, हातेड बु., |
| | डाळिंब | जळगांव | एरंडोल | एरंडोल, रिंगणगाव, उत्राण घ. |
| | डाळिंब | जळगांव | धरणगांव | सोनवद, पिंप्री, धरणगांव, साळवे |
| | डाळिंब | जळगांव | भडगांव | कोळगाव, कजगाव |
| | डाळिंब | जळगांव | जामनेर | जामनेर, नेरी, मालदाभाडी, पहूर, शेदूर्णी, तोंडापुरी, वाकडी, फत्तेपुरी |
| | डाळिंब | धुळे | धुळे | आर्वी, कुसुंबा, नेर (म), लामकणी, धुळे (शहर), शिरुड, बोरकुंड, सोनगिर, नगांव बु., फागणे, मुकटी, धुळे (ग्रामीण) |

| | | | |
|---|---|---|---|
| डाळिंब | धुळे | साक्री | साक्री, कासारे, म्हसदी प्रनेर, दुसाने, निजामपूर, ब्राम्हणवेल, पिंपळनेर, दहीवेल, कुडाशी, उमरपाटा |
| डाळिंब | धुळे | शिंदखेडा | शिंदखेडा, चिमठाणे, शेवाळे, खलाणे, नरडाणे, बेटावद, वर्षी, दोंडाईचा, विखरण, विरदेल |
| डाळिंब | धुळे | शिरपूर | शिरपूर, बोराडी, अर्थे, जवखेडे, होळनाथे, थाळनेर, सांगवी |
| डाळिंब | सांगली | मिरज | आरग, कवलापुर, मालगाव |
| डाळिंब | सांगली | तासगांव | सावळज, मांजर्डे, तासगाव, विसापुर, मणेराजुरी, येळावी. |
| डाळिंब | सांगली | आटपाडी | आटपाडी, दिघंची, खरसुंडी |
| डाळिंब | सांगली | जत | जत, कुंभारी, मुंचडी, शेगाव, माडग्याळ, उमदी, संख, डफळापुर |
| डाळिंब | सांगली | कवठेमंहाकाळ | कवठेमंहाकाळ, कुची, ढालगाव, देसींग, हिंगणगाव |
| डाळिंब | सांगली | खानापुर | विटा, लेंगरे, भाळवणी, खानापुर, करंजे |
| डाळिंब | सांगली | पलूस | पलूस |
| डाळिंब | सांगली | कडेगाव | नेवरी, वांगी |
| डाळिंब | सोलापूर | उत्तर सोलापूर | वडाळा, मार्डी, तिऱ्हे, उत्तरसोलापूर, शेळगी |
| डाळिंब | सोलापूर | दक्षिण सोलापूर | निंबर्गी, बोरामणी, मुक्ती, वळसंग, मंद्रूप, विंचूर, होटगी. |
| डाळिंब | सोलापूर | बार्शी | बार्शी, आगळगांव, पांगरी, नारी, खांडवी, पानगाव, सुर्डी, वैराग, गौडगाव, उपळेदु. |
| डाळिंब | सोलापूर | अक्कलकोट | अक्कलकोट, जेऊर, चपळगांव, तडवळ, करजगी, दुधनी, मैंदर्गी, वागदरी, किणी. |
| डाळिंब | सोलापूर | मोहोळ | मोहोळ, नरखेड, शेटफळ, पेनुर, वाघोली, कामती बु., सावळेश्वर, टाकळी सिकंदर. |
| डाळिंब | सोलापूर | माढा | माढा, दारफळ, रोपळे क., म्हैसगांव, कुर्डुवाडी, टेंभूर्णी, मोडनिंब, लऊळ, रांझणी |
| डाळिंब | सोलापूर | करमाळा | करमाळा, जेऊर, उंमरड, केतूर, केम, कोर्टी, अर्जूननगर, सालसे |
| डाळिंब | सोलापूर | पंढरपुर | पंढरपूर, भंडीशेगांव, भाळवणी, करकंब, पटकुरोली, पुळूज, चळे, तुंगत, कासेगांव |
| डाळिंब | सोलापूर | सांगोला | सांगोला, शिवणे, जवळा, हतीद, सोनंद, कोळा, नाझरा, महुद बु., संगेवाडी, सांगोला श. |
| डाळिंब | सोलापूर | माळशिरस | माळशिरस, इस्लामपूर, अकलूज, लवंग, म्हाळुंग, पिलीव, वेळापूर, नातेपूते, दहीगांव, सदाशिवनगर |
| डाळिंब | सोलापूर | मंगळवेढा | मंगळवेढा, बोराळे, अंधळगाव, भोसे, हुलजंती, मरवडे, मारापूर. |
| डाळिंब | नाशिक | निफाड | लासलगाव, देवगाव, चांदोरी, निफाड, सायखेडा, पिंपळगाव, रानवड, ओझर, नांदुर मंध्यमेश्वर |
| डाळिंब | नाशिक | सिन्नर | सिन्नर, देवपूर, वावी, शहा, पांढुर्ली, डुबेरे, नांदुरशिंगोटे |
| डाळिंब | नाशिक | येवला | पाटोदा, जळगाव नेऊर, येवला, अंदरसुल, सावरगाव, नगरसुल. |
| डाळिंब | नाशिक | मालेगाव | दाभाडी, मालेगाव, वडनेर, करंजगव्हाण, झोडगे, कळवाडी, कवळाणे, सवदाणे, सायने(बु), निमगाव |
| डाळिंब | नाशिक | चांदवड | चांदवड, रायपूर, दिघवद, दुगाव, वडनेरभैरव, वडाळीभोई. |
| डाळिंब | नाशिक | नांदगाव | वेहळगाव, जातेगाव, हिसवळ(बु), नांदगाव, मनमाड |
| डाळिंब | नाशिक | कळवण | कळवण, नवीबेज, दळवट, मोकभणगी |
| डाळिंब | नाशिक | (सटाणा) बागलाण | ब्राम्हणगाव, नामपूर, जायखेडा, विरगाव, डांगसौदाणे, मुल्हेर, ताहराबाद, सटाणा |
| डाळिंब | नाशिक | देवळा | देवळा, लोहणेर, उमराणी |

